वितरण आदेश क्रमांक: १
कोषागारातून रोख रक्कम देय अनुदान
२०११-२०१२.

पंचायत राज संस्थांना केंद्र पुरस्कृत १३ व्या वित्त आयोगांतर्गत जनरल बेसिक ग्रँटच्या सन २०११-१२ च्या पहिल्या हप्त्याच्या प्राप्त अनुदानाचे वितरण.

**महाराष्ट्र शासन**
**ग्राम विकास व जलसंधारण विभाग**
**शासन निर्णय क्रमांक:- तेविआ-२०११/प्र.क्र. ५९/ वित्त-४.**
**मंत्रालय, मुंबई-४०० ०३२,**
**दिनांक :५ ऑगस्ट,२०११**

**वाचा:-** १) शासन निर्णय क्रमांक: तेविआ-२०१०/प्र.क्र. २२ / वित्त-४,ग्राम विकास व जलसंधारण विभाग, मंत्रालय, मुंबई-४०० ०३२, दिनांक : ३० ऑगस्ट,२०१०.
२) शासन पत्र क्र.तेविआ २०१०/प्र.क्र.४३/वित्त-४, दिनांक ७ फेब्रुवारी,२०११.

**प्रस्तावना** :- पंचायत राज संस्थांना त्यांचे बळकटीकरणासाठी, १३ व्या वित्त आयोगाअंतर्गत जनरल बेसिक ग्रँटच्या स्वरुपात केंद्र शासनाकडून २०११-१२ या वर्षाच्या पहिल्या हप्त्यापोटी रु. ३२०.५७ कोटी (तीनशे वीस कोटी सत्तावन्न लक्ष फक्त) इतका निधी राज्यास प्राप्त झाला असून तो निधी सर्व पंचायत राज संस्थांना जिल्हा परिषद ,पंचायत समिती व ग्रामपंचायत स्तरासाठी अनुक्रमे **१०:२०:७०** या प्रमाणात २०११-१२ या आर्थिक वर्षात वितरीत करावयाचा आहे. त्यानुसार शासनाने खालील निर्णय घेतला आहे.

**शासन निर्णय** :- या शासन निर्णयान्वये १३ व्या वित्त आयोगाचा सन २०११-१२ या वित्तीय वर्षाचा जनरल बेसिक ग्रँटच्या स्वरुपातील **पहिल्या हप्त्याचा** रु.३२०,५७,००,०००/- (रुपये तीनशे वीस कोटी सत्तावन्न लाख फक्त) इतका निधी सोबतच्या प्रपत्रात दर्शविल्याप्रमाणे सर्व जिल्हा परिषदांना (जि.प./पं.स./ग्रा.पं स्तरासाठी) अनुक्रमे १०:२०:७० या प्रमाणात वितरीत करण्यात येत आहे. सर्व स्तरासाठीचा एकत्रित निधी जिल्हा परिषदांच्या मुख्य कार्यकारी अधिकारी यांच्या अर्थसंकल्पीय वितरण प्रणालीवर (बी.डी.एस.) वितरीत करण्यात येत आहे.

२ विवरण पत्रात दर्शविल्याप्रमाणे सर्व स्तरासाठीचा एकत्रित निधी प्राप्त झाल्यानंतर मुख्य कार्यकारी अधिकारी यांनी त्या निधीचे जिल्हा परिषद/पंचायत समिती/ग्रामपंचायत स्तरासाठी १०:२०:७० या प्रमाणात विभाजन करावे व जिल्हा परिषद स्तराचा १० टक्के निधी वगळून पंचायत समित्या व ग्रामपंचायत स्तरासाठीचा निधी संदर्भ क्र. १ च्या शासन निर्णयात पंचायत समित्यांना निधी वितरण करण्यासाठी नमूद केलेल्या विहीत निकषानुसार वितरीत करावा.तथापि, जिल्हा परिषद स्तरावरून ग्रामपंचायतींना निधी वितरण करण्यासाठी संदर्भ क्र.१ च्या शासन निर्णयातील **ब** (IV) मध्ये दिलेल्या विहीत निकषात **खालील अ व ब नुसार** बदल करून ग्रामपंचायतींना वितरीत करावयाच्या निधीचे प्रगणन (Calculation) करावे.

(अ) ग्रामपंचायतींना वितरीत करावयाच्या निधीचे प्रगणन करताना निकष क्रमांक-५ (प्लॅन प्लस सॉफ्टवेअरचा वापर) चे ५ टक्के प्रमाण पर्यावरण संतुलीत समृध्द ग्राम योजनेच्या अंमलबजावणीसाठी असलेल्या १५ टक्के प्रमाणात समाविष्ट करुन ग्रामपंचायतींना वितरीत करावयाच्या निधीचे प्रगणन करावे. तथापि, ज्या जिल्ह्यांना मागास क्षेत्र विकास निधी (BRGF) ही योजना लागू आहे त्या जिल्ह्यांनी ग्रामपंचायतींना वितरीत करावयाच्या निधीचे प्रगणन प्लॅन प्लस सॉफ्टवेअरचा वापर या निकषानुसार करावे.

(ब) निकष क्रमांक-८ ( ग्राम रचना आराखडा मंजूर असलेल्या ग्रामपंचायती (D.P.Plan) ) चे ५ टक्के प्रमाण भारताचे नियंत्रक व महालेखा परीक्षक यांनी ठरवून दिलेल्या सुधारित नमुन्यात लेखे ठेवण्याच्या ( प्रिया सॉप्टच्या) अंमलबजावणीसाठी असलेल्या १० टक्के प्रमाणात समाविष्ट करुन त्यानुसार ग्रामपंचायतींना वितरीत करावयाच्या निधीचे प्रगणन करावे.

३. मुख्य कार्यकारी अधिकारी यांनी वितरीत करावयाच्या निधीचे उपरोक्त सूचनांनुसार प्रगणन केल्यानंतर पंचायत समिती व ग्रामपंचायतींना देय असणारा निधी ५ ते १० दिवसाचे आत इ.सी.एस. (Electronic

Clearance System)/एन.इ.एफ.टी (National Electronic Fund Transfer) किंवा आर.टी.जी.एस. (Real Time Gross Settlement) यापैकी उपलब्ध असलेल्या बँकिंग सिस्टीमद्वारे, सर्व मुख्य कार्यकारी अधिकारी,जिल्हा परिषद यांनी सदर पंचायत समित्या व ग्राम पंचायतींच्या खात्यावर वर्ग करावा. निधी वर्ग करण्यास ५ ते १० दिवसांपेक्षा जास्त विलंब झाल्यास त्या विलंबाबाबत भारतीय रिझर्व बँकेच्या दराने आपणास व्याज द्यावे लागेल, याची आपण नोंद घ्यावी.

४. **या वितरण आदेशानुसार प्राप्त निधीचा विनियोग निधी वितरीत झाल्यापासून सहा महिन्याच्या आत करावयाचा आहे. तसेच आदेश क्रमांक -तेविआ २०१०/प्र.क्र.४३/वित्त-४ दिनांक ३०/८/२०१० च्या वितरण आदेशान्वये जनरल बेसिक ग्रँटच्या स्वरूपात प्राप्त झालेल्या निधीतील अखर्चित रक्कम ,आदेश क्रमांक -तेविआ २०११ /प्र.क्र.२३ /वित्त-४ दिनांक १०/३/२०११ अन्वये प्राप्त व्याजाची रक्कम व आदेश क्रमांक -तेविआ २०११ /प्र.क्र.२९ /वित्त-४ दिनांक २५/३/२०११ च्या वितरण आदेशान्वये जनरल बेसिक ग्रँटच्या स्वरूपात प्राप्त झालेल्या निधीतील अखर्चित रक्कमेचा विनियोगही या आदेशाच्या दिनांकापासून पुढील सहा महिन्यापर्यन्त करण्यासाठी परवानगी (मुदतवाढ ) देण्यात येत आहे.** निधी विहित वेळेत खर्च करण्याची जबाबदारी संबंधित मुख्य कार्यकारी अधिकारी, जिल्हा परिषद तसेच संबंधित गट विकास अधिकारी, पंचायत समिती व ग्रामसेवक / ग्राम विकास अधिकारी, ग्रामपंचायत यांची राहील. मुख्य कार्यकारी अधिकारी, जिल्हा परिषद यांनी पंचायत राज संस्थांच्या तीनही स्तरावर झालेल्या खर्चाचा आढावा प्रत्येक महिन्यात घ्यावा व हा निधी शासनाने मंजूर केलेल्या प्रयोजनासाठी व विहित वेळेत खर्च करावा यादृष्टीने योग्य अशा उपाययोजना कराव्यात. **सदर निधी खर्च करताना १३ व्या वित्त आयोगांतर्गत उपलब्ध निधीच्या मर्यादेतच कामाचे नियोजन करावे जास्तीचे दायित्व निर्माण करु नये, तसेच संदर्भ क्र-१ च्या शासन निर्णयात व या शासन निर्णयात दिलेल्या सूचनांचे तंतोतंत पालन करुन निधी खर्च करावा**. निधी विहित वेळेत खर्च न झाल्यास त्याची सर्व जबाबदारी अंतिमतः मुख्य कार्यकारी अधिकारी यांची राहील व त्याची नोंद त्यांच्या गोपनीय अहवालात घेण्यात येईल.

५. विवरणपत्रात दर्शविलेला जनरल बेसिक ग्रँटच्या स्वरुपात जिल्हा परिषद स्तरासाठी वितरीत केलेला निधी २५१५१५२३ या लेखाशीर्षाखाली, पंचायत समिती स्तरासाठी वितरीत केलेला निधी २५१५ १९९१ या लेखाशीर्षाखाली व ग्रामपंचायत स्तरासाठी वितरीत केलेला निधी २५१५ १९५३ या लेखाशीर्षाखाली, सन २०११-१२ च्या अर्थसंकल्पीय तरतूदीतून वितरीत करण्यात येत असून हा निधी खर्च करण्यास शासनातर्फे मान्यता देण्यात येत आहे. या निधीतून बाबनिहाय झालेल्या खर्चाची माहिती, संदर्भ क्र.२ नुसार दिलेल्या विहित विवरणपत्रात पुढील प्रत्येक महिन्याच्या १० तारखेपर्यंत न चुकता आपल्या विभागाच्या उपायुक्त (विकास) यांचे कार्यालयास व शासनास सादर करावी. तसेच, निधीच्या खर्चाचे अंतिम उपयोगिता प्रमाणपत्र व आर्थिक/ भौतिक अहवालही त्यासोबत शासनास आणि महालेखापाल कार्यालयास पाठविण्यात यावा.

६. जिल्हा परिषद स्तरासाठी वितरीत निधीतून होणारा खर्च मागणी क्र.एल-३, २५१५ - इतर ग्रामीण विकास कार्यक्रम, १९६ - जिल्हा परिषद/जिल्हा स्तरीय पंचायतीस सहाय्य, (००) (०१) १३ व्या वित्त आयोगाच्या शिफारशीनुसार पंचायत राज संस्थांना विविध विकास योजनांसाठी अनुदाने (योजनेतर) (२५१५ १५२३) (जनरल बेसिक ग्रँट) , ३१ - सहाय्यक अनुदाने या लेखाशिर्षाखाली सन २०११-२०१२ या आर्थिक वर्षाच्या अर्थसंकल्पीय तरतूदीतून खर्ची टाकावा.

७. पंचायत समिती स्तरासाठी वितरीत निधीतून होणारा खर्च मागणी क्र.एल-३, २५१५ - इतर ग्रामीण विकास कार्यक्रम, १९७ - पंचायत समितीस सहाय्य, (००) (०१) १३ व्या वित्त आयोगाच्या शिफारशीनुसार पंचायत राज संस्थांना विविध विकास योजनांसाठी अनुदाने (योजनेतर) (२५१५ १९९१) (जनरल बेसिक ग्रँट) , ३१ - सहाय्यक अनुदाने या लेखाशिर्षाखाली सन २०११-२०१२ या आर्थिक वर्षाच्या अर्थसंकल्पीय तरतूदीतून खर्ची टाकावा.

८. ग्रामपंचायत स्तरासाठी वितरीत निधीतून होणारा खर्च मागणी क्र.एल-३, २५१५ - इतर ग्रामीण विकास कार्यक्रम, १९८ - ग्रामपंचायतीस सहाय्य (००) (०२) १३ व्या वित्त आयोगाच्या शिफारशीनुसार पंचायत राज

संस्थांना विविध विकास योजनांसाठी अनुदाने (योजनेतर) (२५१५ १९५३) (जनरल बेसिक ग्रँट ), ३१ - सहाय्यक अनुदाने, या लेखाशिर्षाखाली सन २०११-२०१२ या आर्थिक वर्षाच्या अर्थसंकल्पीय तरतूदीतून खर्ची टाकावा.

९. सदरचा शासन निर्णय, वित्त विभागाच्या सहमतीने अनौपचारिक संदर्भ क्र.७३/२०११/विआक, दिनांक ४/८/२०११ नुसार निर्गमित करण्यात येत आहे.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या वेबसाईटवर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संगणक सांकेतांक क्र. **२०११०८०५१३१६५७००१** असा आहे.

**महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,**

**( प्रतिभा मा. पाटील )**
**कार्यासन अधिकारी , महाराष्ट्र शासन.**

प्रति,
मा.मंत्री (ग्रा.वि.) यांचे खाजगी सचिव
मा. राज्यमंत्री (ग्रा.वि.) यांचे खाजगी सचिव
मा.सचिव (ग्रा.वि. व पं.रा.) यांचे स्वीय सहाय्यक
महालेखापाल, महाराष्ट्र - १ (लेखापरीक्षा), मुंबई (पाच जादा प्रतीसह)
महालेखापाल, महाराष्ट्र - २ (लेखापरीक्षा), नागपूर (पाच जादा प्रतीसह)
सर्व विभागीय आयुक्त.(महसूल)
सर्व जिल्हा परिषदांचे अध्यक्ष.
संचालक, स्थानिक निधी लेखा, नवी मुंबई.
सर्व सहमुख्य लेखा परिक्षक, स्थानिक निधी लेखा (सर्व विभाग)
सर्व जिल्हा परिषदांचे मुख्य कार्यकारी अधिकारी.
सर्व जिल्हा परिषदांचे मुख्य लेखा व वित्त अधिकारी,
सर्व जिल्हा परिषदांचे उप मुख्य कार्यकारी अधिकारी (पंचायत)
सर्व जिल्हा कोषागार अधिकारी
वित्त विभाग का.क्र.(व्यय-१५/अर्थोपाय /वित्त आयोग कक्ष/अर्थसंकल्प-१७)
कक्ष अधिकारी, कार्यासन क्र. वित्त-१/वित्त-७/वित्त-८, ग्राम विकास विभाग,मंत्रालय, मुंबई - ३२
निवड नस्ती का.क्र.वित्त-४, ग्राम विकास व जलसंधारण विभाग, मंत्रालय, मुंबई - ३२

जनरल बेसिक ग्रँट वितरण आदेश क्रमांक:१
शासन निर्णय क्रमांक तेविआ २०११/ प्र.क्र. ५९ /वित्त-४,
दिनांक- ५ ऑगस्ट,२०११ चे प्रपत्र.

(रु. हजारात)

| अ.क्र. | जिल्हा परिषदेचे नाव | जिल्हा परिषद स्तर | पंचायत समिती स्तर | ग्रामपंचायत स्तर | एकूण |
|---|---|---|---|---|---|
| १ | ठाणे | ११११४ | २२३८८ | ७८३५८ | १११९४० |
| २ | रायगड | ८२८६ | १६५७२ | ५८००२ | ८२८६० |
| ३ | रत्नागिरी | ८१४० | १६२८० | ५६९८० | ८१४०० |
| ४ | सिंधुदुर्ग | ५३८६ | १०७७२ | ३७७०२ | ५३८६० |
| ५ | नाशिक | १५२२४ | ३०४४८ | १०६५६८ | १५२२४० |
| ६ | धुळे | ८७९६ | १७५९२ | ६१५७२ | ८७९६० |
| ७ | नंदूरबार | ९७१४ | १९४२८ | ६७९९८ | ९७१४० |
| ८ | जळगाव | १२८२६ | २५६५२ | ८९७८२ | १२८२६० |
| ९ | अहमदनगर | १५५९० | ३११८० | १०९१३० | १५५९०० |
| १० | पुणे | १३४२३ | २६८४६ | ९३९६१ | १३४२३० |
| ११ | सातारा | ११३०४ | २२६०८ | ७९१२८ | ११३०४० |
| १२ | सांगली | ९७७२ | १९५४४ | ६८४०४ | ९७७२० |
| १३ | सोलापूर | १३३०२ | २६६०४ | ९३११४ | १३३०२० |
| १४ | कोल्हापूर | १०९३६ | २१८७२ | ७६५५२ | १०९३६० |
| १५ | औरंगाबाद | ९५८३ | १९१६६ | ६७०८१ | ९५८३० |
| १६ | जालना | ८०७८ | १६१५६ | ५६५४६ | ८०७८० |
| १७ | परभणी | ६९१७ | १३८३४ | ४८४१९ | ६९१७० |
| १८ | हिंगोली | ६४६१ | १२९२२ | ४५२२७ | ६४६१० |
| १९ | बीड | १०१२७ | २०२५४ | ७०८८९ | १०१२७० |
| २० | नांदेड | ११८७९ | २३७५८ | ८३१५३ | ११८७९० |
| २१ | उस्मानाबाद | ८२०३ | १६४०६ | ५७४२१ | ८२०३० |
| २२ | लातूर | ९२२३ | १८४४६ | ६४५६१ | ९२२३० |
| २३ | बुलढाणा | ९९६७ | १९९३४ | ६९७६९ | ९९६७० |
| २४ | अकोला | ६९१३ | १३८२६ | ४८३९१ | ६९१३० |
| २५ | वाशिम | ६७८२ | १३५६४ | ४७४७४ | ६७८२० |
| २६ | अमरावती | ११०५३ | २२१०६ | ७७३७१ | ११०५३० |
| २७ | यवतमाळ | ११९६३ | २३९२६ | ८३७४१ | ११९६३० |
| २८ | वर्धा | ६९३३ | १३८६६ | ४८५३१ | ६९३३० |
| २९ | नागपूर | ८९२२ | १७८४४ | ६२४५४ | ८९२२० |
| ३० | भंडारा | ६६२३ | १३२४६ | ४६३६१ | ६६२३० |
| ३१ | गोंदिया | ७४१४ | १४८२८ | ५१८९८ | ७४१४० |
| ३२ | चंद्रपूर | ९७३४ | १९४६८ | ६८१३८ | ९७३४० |
| ३३ | गडचिरोली | ९९०२ | १९८०४ | ६९३१४ | ९९०२० |
| | एकूण | **३२०५७०** | **६४११४०** | **२२४३९९०** | **३२०५७००** |

( प्रतिभा मा. पाटील )
कार्यासन अधिकारी,महाराष्ट्र शासन.